**बीज, रासायनिक खत, किटकनाशके चाचणी, किडनाशके उर्वरीत अंश तपासणी व जैविक किड नियंत्रण प्रयोगशाळा या योजनेतील अस्थायी पदे दिनांक ०१/०९/२०२० पासून दिनांक २८/०२/२०२१ पर्यंत पुढे चालु ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण १६१९/प्र.क्र. ५६/१७-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०७/०९/२०२०.

वाचा:-

१. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ- ११११/ ०३०५/ २०-२१/ प्र.क्र.६/ आस्था-५ (निप) /६६६७ दिनांक १५/०२/२०२०.
२. वित्त विभागाचे शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/ प्र.क्र. ८/१६/ आ.पु.क., दि. १२/०२/२०२०.
३. कृषि विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण १६१९/प्र.क्र.५६/१७-अे, दि. २७/०३/२०२०
४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.६२/कोषा प्रशा-५, दि, ३१/०३/२०२०
५. कृषि विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण १६१९/ प्र.क्र.५६/१७-अे, दि. १६/०४/२०२०
६. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ-११११/साप्र/०३०५/२०-२१/प्रक्र-६/आस्था-५(निप)/ २९३/ दि. २९/०५/२०२०
७. कृषि विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण १६१९/प्र.क्र. ५६/१७-अे, दि. ०१/०७/२०२०
८. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ ११११/०३०५/२०-२१/प्रक्र.६/आस्था-५(निप)/१९३०८, दि. १७/०८/२०२०
९. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. २१/०८/२०२०

**प्रस्तावना:**

कृषि विभागातील १०३ (००) (०२) बीज, रासायनिक खत, किटकनाशके चाचणी, किडनाशके उर्वरित अंश तपासणी व जैविक किड नियंत्रण प्रयोगशाळा या योजनेअंतर्गत २८२ पदे निश्चित करण्यात आलेली असून त्यापैकी १५ स्थायी पदे वगळता उर्वरित २६७ अस्थायी पदे दिनांक ३१/०८/२०२० पर्यंत चालू ठेवण्यास या विभागाच्या संदर्भ क्र. ३ व ७ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली होती. आता, संदर्भ क्र. ९ येथील शासन निर्णयान्वये वित्त विभागाने निर्गमित केलेल्या आदेशानुसार सदर अस्थायी पदे दिनांक ०१/०९/२०२० पासून दिनांक २८/०२/२०२१ पर्यंत या कालावधीत पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

बीज, रासायनिक खत, किटकनाशके चाचणी, किडनाशके उर्वरीत अंश तपासणी व जैविक किड नियंत्रण प्रयोगशाळा या योजनेतील २८२ मंजूर पदांपैकी १५ स्थायी पदे वगळता उर्वरीत २६७ अस्थायी पदे आकृतीबंधात समाविष्ट असल्याचे अधीन राहून दिनांक ०१/०९/२०२० ते दिनांक २८/०२/२०२१ पर्यंत पुढे चालु ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. (सोबत विवरणपत्र जोडले आहे)

या प्रित्यर्थ होणारा सदर खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक : डी-३
२४०१, पीक संवर्धन,
१०३, बी- बियाणे,
१०३ (००) (०२) बीज, रासायनिक खत नियंत्रण व
किडनाशक चाचणी प्रयोगशाळा ( २४०१ ०३०५)

हे आदेश वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६/ प्र.क्र. ८/ १६/ आ.पु. क. दिनांक ३१/ ०८/२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९०८१४३१४७८६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe,
serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2020.09.08 14:32:32 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
५. कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. कृषि सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
८. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०. उप संचालक (बियाणे), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
११. प्रशासन अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. सर्व जिल्हा शासकीय मृद सर्वेक्षण व मृद चाचणी प्रयोगशाळा
१३. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई
१४. कार्यासन (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. १७-अे कार्यासन, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई (निवडनस्ती ).

**शासन निर्णय कृषि व पदुम विभाग संकीर्ण १६१९/ प्र.क्र. ५६/ १७-अे**
**दिनांक : ०७/०९/२०२० चे सहपत्र**

**<u>विवरण पत्र</u>**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | बीज परिक्षण अधिकारी (गट-अ) | ०१ |
| २ | तंत्र अधिकारी / विश्लेषणात्मक रसायनशास्त्रज्ञ/ रसायनशास्त्रज्ञ (गट-ब) | २१ |
| ३ | कृषि अधिकारी (गट-ब) | ५९ |
| ४ | कृषि पर्यवेक्षक (गट-क) | १९ |
| ५ | कृषि सहाय्यक (गट- क) | ६८ |
| ६ | वरिष्ठ लिपीक (गट-क) | ०७ |
| ७ | लिपीक (गट- क) | २३ |
| ८ | प्रयोगशाळा सहाय्यक/ परिचर (गट-क) | १४ |
| ९ | शिपाई / पहारेकरी | ३५ |
| १० | स्वीपर | १७ |
| ११ | क्लिनर | ०३ |
| | **एकूण** | **२६७** |